**मुंबई शहर व उपनगरातील उपकरप्राप्त/बिगर उपकरप्राप्त इमारती आणि महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाशी संबंधित इमारतींशी निगडीत धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी शासनास सुचना करण्याकरिता समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. विमंका -२०१६/प्र.क्र. १४२/ दुवपू-१,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- २९ ऑक्टोबर, २०१६

**प्रस्तावना**

महाराष्ट्र विधानमंडळाच्या जुलै, २०१६ च्या पावसाळी अधिवेशनात गृहनिर्माण विभागाच्या सन २०१६-१७ च्या पुरवणी मागण्यांवरील चर्चेदरम्यान "चालू अधिवेशन संपण्यापूर्वी दोन्ही सभागृहांशी संबंधित सर्व सदस्यांची एक कमिटी बनवून ती जाहीर करण्यात येईल, त्या कमिटीस दोन महिन्यांची मुदत देण्यात येईल व या कमिटीसमोर सेस, नॉन सेस, बीआयटी, पीएमजीपी इमारती व आर.आर.बोर्डाचा तसेच ३३(७) वगैरे सर्व विषयांचा अभ्यास करुन दोन महिन्यांच्या कालावधीत अहवाल मागविण्यात येईल" असे आश्वासन मा. मंत्री, गृहनिर्माण यांनी दिलेले आहे. सदर आश्वासन पुर्ततेच्या दृष्टीने एक समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुंबई शहर व उपनगरातील जुन्या व मोडकळीस आलेल्या उपकरप्राप्त/बिगर उपकरप्राप्त इमारती, बी.आय.टी. इमारती,रेफ्युजी इमारती, पी.एम.जी.पी. इमारती आणि महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाशी संबंधित इमारतींशी निगडीत सर्व विषय तसेच गृहनिर्माणासंबंधी कामामध्ये स्पष्ट धोरणात्मक निर्णय घेण्यासाठी विकास नियंत्रण नियमावलीत आवश्यक सुधारणांबाबत शासनास शिफारस करण्याकरिता खाली दर्शविल्याप्रमाणे समिती गठीत करण्याचा निर्णय घेतला आहे.

१. मा. श्री. मंगलप्रभात लोढा, विधानसभा सदस्य - सदस्य
२. मा.श्री. राज के. पुरोहित, विधानसभा सदस्य - सदस्य
३. मा. श्री. कॅ.तामिल सेल्वन, विधानसभा सदस्य - सदस्य
४. मा. श्री. अजय चौधरी, विधानसभा सदस्य - सदस्य
५. मा. श्री. सुनिल शिंदे, विधानसभा सदस्य - सदस्य
६. मा. श्री. वारीस पठाण, विधानसभा सदस्य - सदस्य
७. मा. श्री. अमीन पटेल, विधानसभा सदस्य - सदस्य
८. मा. ॲड राहूल नार्वेकर, विधानपरिषद सदस्य - सदस्य

२. समितीचे संयोजक (Convener) म्हणून प्रधान सचिव (गृहनिर्माण) हे कामकाज पाहतील. समितीच्या बैठकांना निमंत्रित सदस्य म्हणून प्रधान सचिव (गृहनिर्माण) यांना उचित वाटेल त्या अधिकाऱ्यांना बोलाविण्याचा अधिकार राहिल.

३. या समितीची कार्यकक्षा सोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविल्याप्रमाणे राहिल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१६११०३१२१४३३३३०९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Meenal Dilip Pednekar

Digitally signed by Meenal Dilip Pednekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d3ff92ae3a8e5839988ca45db0eee3f448a9c88472103709dc1e857938d39c04, cn=Meenal Dilip Pednekar
Date: 2016.11.03 15:48:50 +05'30'

**(मीनल पेडणेकर)**
अवर सचिव (गृहनिर्माण)

**प्रत:**

(१) समितीचे सर्व सन्माननीय सदस्य
(२) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे विशेष कार्य अधिकारी, राजभवन, मुंबई.
(२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
(३) मा. मंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
(५) मा. राज्यमंत्री, गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
(६) मा. राज्यमंत्री, नगरविकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
(७) मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
(८) प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -३२.
(८) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-१)यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -३२.
(८) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
(९) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पू), मुंबई - ४०० ०५१.
(१०) उप सचिव, गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -३२.
(११) सर्व अवर सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय क्र. विमंका- २०१६/प्र.क्र. १४२/दुवपू-१ चे सहपत्र.**

**"परिशिष्ट"**

**समितीची कार्यकक्षा**

१. बृहन्मुंबई क्षेत्रातील जुन्या मोडकळीस आलेल्या उपकरप्राप्त इमारती,बिगर उपकरप्राप्त इमारती यासंदर्भातील मंजूर विकास नियंत्रण नियमावलीतील विनियम ३३(६),३३ (७) व ३३ (९) च्या तरतुदी व प्रारुप प्रसिध्द सुधारित विकास नियंत्रण नियमावलीतील तरतूदी विचारात घेवून उपाययोजना सुचविणे.

२. मुंबई तसेच मुंबईच्या उपनगरातील जुन्या इमारतीं उदा. उपकरप्राप्त / बिगर उपकरप्राप्त इमारती, बी.आय.टी. इमारती, रेफ्युजी इमारती, पी.एम.जी. इमारती व महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाशी संबंधित इमारतीबाबत म्हाडा अधिनियम, १९७६ मध्ये करावयाच्या सुधारणा.

३. अशा इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचनेकरिता तरतुदी करावयाच्या झाल्यास निधीची उभारणी कोणत्या प्रकारे करता येईल याबाबत शिफारशी.

४. अशा इमारतींची दुरुस्ती व पुनर्रचनेच्या कामाची व्याप्ती वाढविण्याचे निश्चित झाल्यास इमारतींचे मालक व भाडेकरु यांना या कार्यक्रमात सहभागी करुन घेण्यासाठी करावयाच्या प्रोत्साहनात्मक तरतुदी.

५. मुंबई शहर व उपनगरातील सुस्थितीत असलेल्या भाडेतत्वावरील इमारतींची दुरुस्ती व देखभाल वेळच्या वेळी व्हावी, त्यांची आयुमर्यादा कमी होऊ नये म्हणून करावयाच्या प्रतिबंधात्मक उपाययोजना याबाबत शिफारशी करणे.

६. संक्रमण शिबीरांची पुनर्बांधणी व संक्रमण शिबीरातील घुसखोरी रोखणे व त्यांचेवर कारवाई करणेबाबत शिफारशी करणे.

--------------